201010915152800।

**सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेची रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय** क्र.सुजयो २०१०/प्र.क्र.१३५/नवि-१६
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ सप्टेंबर, २०१०

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.सुजयो-२०१०/प्र.क्र.६३/नवि-४, दिनांक ९ जून, २०१०

२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय मुंबई यांचे पत्र क्र.सुजयो-२०१०/ आस्थापना खर्च / प्र.क्र.२७५/का-१७, दिनांक : १२ एप्रिल, २०१० चे पत्र.

**<u>शासन निर्णय</u> :-** उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दिनांक ९ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेच्या आस्थापना अनुषंगिक खर्चाकरिता सन २०१०-११ मध्ये रु. ३१६.४० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय मुंबई यांनी सदर तरतूद उपलब्ध करुन देण्याची विनंती केलेली आहे.

०२. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीपैकी खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली उद्दिष्टनिहाय वाटपासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी , मुंबई यांना सुपूर्द करण्यात येत आहे. यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई **"आहरण व संवितरण"** तसेच **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

मागणी क्रमांक एफ-३
२२३०- कामगार व सेवायोजन
(०२) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना
राज्य योजना
(०२) (०१) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना दत्तमत (२२३०१२३२)

| | |
|---|---|
| ०१ वेतन........................................ | रु.१,३२,६६,०००/- |
| ०६ दूरध्वनी वीज व पाणी शुल्क ................ | रु. ३,९८,०००/- |
| ११ देशांतर्गत प्रवास खर्च ........................ | रु. ६,३०,०००/- |
| १३ कार्यालयीन खर्च.............................. | रु. ७,०६,०००/- |
| **एकूण** | **रु. १,५०,००,०००/-** |

०३. सदर निधी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी यांनी त्यांच्यास्तरावर वितरीत करावा.

कृ.मा.पहा.

०४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च वर नमूद केलेलया लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ मध्ये मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक. २०९/१४४४, दि.१५ जुलै,२०१० तसेच वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांकः ४२४/व्यय-३, दिनांक १५ सप्टेंबर, २०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आय.एम. मोरे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेख परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव/कक्ष अधिकारी(नवि-४)/लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग
निवड नस्ती नवि-१६

----------

सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेची
<u>रक्कम वितरीत करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय** क्र.सुजयो २०१०/प्र.क्र.१३५/नवि-१६
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ सप्टेंबर, २०१०

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.सुजयो-२०१०/प्र.क्र.६३/नवि-४, दिनांक ९ जून, २०१०
२) केंद्र शासनाचे पत्र क्र.जी -७४०११/३/२०१०-युपीए, दिनांक .८ सप्टेंबर,२०१०.
३) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय मुंबई यांचे पत्र क्र.सुजयो-२०१०/आस्थापना खर्च/ प्र.क्र.२७५/का-१७, दिनांक : १२ एप्रिल, २०१० चे पत्र.

**<u>शासन निर्णय</u> :-**

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील दिनांक ९ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता रु.३०००.०० लक्ष इतकी तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने रु ४५१४.१६ लक्ष इतका निधी प्रथम टप्पा म्हणून वितरित केलेला आहे. केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा वितरीत करण्याबाबतची विनंती आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये केली आहे.

०२. सदर केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत केंद्र शासनाने वितरित केलेल्या रु.४५१४.१६ लक्ष अनुदानाच्या प्रमाणात राज्य शासनाचा २५% हिस्सा म्हणून रु. १५०४.०० लक्ष इतके अनुदान, आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०३. उपरोक्त निधी वितरीत करण्यासाठी **सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.** त्यांनी सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे सादर करुन धनादेश प्राप्त करुन घ्यावा.

०४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.एफ-३, "२२३० कामगार व सेवायोजन- ०२, सेवायोजन, १०१ सेवायोजन सेवा पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना (०२) (०१) राज्य योजना (२२३०१२३२) ३१, सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

कृ.मा.पहा.

०५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक. २०९/१४४४, दि.१५ जुलै, २०१० तसेच वित्त विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्रमांकः ४२४/व्यय-३, दिनांक १५ सप्टेंबर, २०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( आय.एम. मोरे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव/कक्ष अधिकारी(नवि-४)/लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग
निवड नस्ती नवि-१६.

----------